सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिट सेल), मुंबई या कार्यालयाकरिता भाडयाने घेण्यात आलेल्या एम.टी.एन.एल., कुपरेज टेलिफोन एक्सचेंज बिल्डिंग, मुंबई येथील ७ व्या मजल्यावरील ६३८५ चौरस फुट चटई क्षेत्रफळ जागेबाबतच्या भाडेकराराचे पुढील पाच वर्षाकरिता नुतनीकरण करण्याबाबत (दि. १.११.२०२२ ते दि.३१.१०.२०२७)

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्र. सवरी-१४१७/१२४६/प्र.क्र.११७/१७/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २३ मार्च, २०२३

**संदर्भ** :- १) समक्रमांकित शासन निर्णय, दि.३१ ऑगस्ट, २०१७.
२) समक्रमांकित शासन निर्णय शुध्दीपत्रक, दि.१४ सप्टेंबर, २०१७ व दि. ५ ऑक्टोबर, २०१७,
३) समक्रमांकित शासन निर्णय, दि.२९ नोव्हेंबर, २०१७.
४) सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिट सेल), मुंबई यांचे पत्र क्र. आस्था/रिटसेल/१६४२०/२०२२, दि.१८ ऑक्टोबर, २०२२
५) डेप्युटी मॅनेजर (स्पेस मॅनेजमेंट-III)एम.टी.एन.एल., मुंबई यांचे पत्र क्र.डीजीएम (एएम-II)/एफटीएस-२४७४४/सीपीआर/गव्हर्नमेंट प्लीडर डब्ल्युसी/रिनिवल/२०२२-२३/८, दि.२० सप्टेंबर २०२२
६) सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिट सेल), मुंबई यांचे पत्र क्र. आस्था/रिटसेल/१४७९५/२०२२, दि.२१ सप्टेंबर २०२२
७) डेप्युटी मॅनेजर (स्पेस मॅनेजमेंट-झेड४) एम.टी.एन.एल., मुंबई यांचे पत्र क्र.डीजीएम (एएम-II)/एफटीएस-२४७४४/सीपीआर/गव्हर्नमेंट प्लीडर डब्ल्युसी/रिनिवल/२०२२-२३, दि.१९ नोव्हेबर २०२२
८) सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिट सेल), मुंबई यांचे पत्र क्र. आस्था/रिटसेल/१८०७५/२०२२, दि.२४ नोव्हेबर२०२२
९) समक्रमांकित शासन पत्र दि.६ फेब्रुवारी,२०२३
१०) सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिट सेल), मुंबई यांचे पत्र क्र. आ.शा/रिटसेल/२९८३/२०२३, दि.२१ फेब्रुवारी,२०२३

**प्रस्तावना :-**

सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा (रिट सेल), मुंबई या कार्यालयाकरिता एम.टी.एन.एल., कुपरेज टेलिफोन एक्सचेंज बिल्डिंग, मुंबई येथील ७ व्या मजल्यावरील ७००० चौ.फुट जागा रु. २८९.४० प्रति चौरस फुट प्रति मास या दराने भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली होती. तद्नंतर, संदर्भ क्र.२ येथील दि. १४ सप्टेंबर २०१७ च्या शासन निर्णय शुद्धीपत्रकान्वये, ७००० चौ.फु. ऐवजी ६३८५ चौ.फु. जागा, तसेच रु.२८९.४०/- याऐवजी रु. ३०३.८७ /- प्रति चौ.फु. प्रति मास दर अशी सुधारणा करण्यात आलेली आहे. तसेच दि. ५ ऑक्टोबर, २०२२ च्या शासन निर्णय शुद्धीपत्रकान्वये लागू असलेल्या सर्व करांसहित ऐवजी लागू होणारे सर्व कर वगळून अशी दराच्या अनुषंगाने सुधारणा करण्यात आलेली आहे.

२. सदर जागेबाबत सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा (रिट सेल), मुंबई यांनी एम.टी.एन.एल., सोबत दि. ०१.११.२०१७ पासून पुढील ५ वर्षाकरिता भाडेकरार केलेला होता. सदर कराराची मुदत दिनांक ३१.१०.२०२२ रोजी संपुष्टात आलेली आहे. सदर भाडेकराराचे नुतनीकरण करण्याच्या अनुषंगाने, एम.टी.एन.एल., मुंबई यांनी त्यांचे संदर्भ क्र. ५ येथील दि.२०.०९.२०२२ च्या पत्रान्वये दरपत्रक सादर केलेले असून, सदर दरपत्रकात दि. ०१.११.२०२२ ते दि .३१.१०.२०२३ या कालावधी करीता रू. ३८७.८२/- प्रती चौ. फूट ( सध्याचे व भविष्यातील कर, शुल्क व उपकर तथा पाणी पट्टी वगळता) प्रमाणे पुढील पाच वर्षाकरिता दरसाल ५ टक्के भाडेवाढ प्रमाणे दर देण्यात आला आहे.त्यानुसार मासिक व वार्षिक भाड्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

**<u>सध्याचे व भविष्यातील कर, शुल्क व उपकर तथा पाणी पट्टी वगळून दि. १.११.२०२२ ते दि.३१.१०.२०२३ या कालावधीकरिता भाड्याबाबतचा तपशिल</u>**

| अ. क्र. | मजला | चटई क्षेत्रफळ | भाडे दर प्रती चौरस फुट प्रती मास (कर विरहित) व कालावधी | मासिक भाडे ( Monthly License Fee) | एकूण वार्षिक भाडे(Monthly License Fee) |
|---|---|---|---|---|---|
| १ | ७ वा मजला | ६३८५ चौ.फु. | रू.३८७.८२/-<br>(दि. १.११.२०२२ ते दि.३१.१०.२०२३) | रू.२४,७६,२३०.७०/-<br>पूर्णांकात रू.२४,७६,२३१/- | रू. २,९७,१४,७६८.४/-<br>पूर्णांकात रू. २,९७,१४,७६८/- |

**<u>एम.टी.एन.एल., मुंबई यांनी घातलेल्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत:-</u>**

१) भाडेपट्टा (Leave License) कराराचा कालावधी ५ वर्षांचा राहील. (दि. १.११.२०२२ ते दि.३१.१०.२०२७)
२) लायसेन्स फी ही, विद्यमान व भविष्यात लागू होणारे कोणतेही टॅक्सेस, चार्जेस ,ड्युटीज् ,सेस इत्यादी वगळून आहे.
३) लायसेन्स फी (License Fee) च्या शुल्कात प्रतिवर्षी ५ टक्क्याने वाढ करण्यात येईल.
४) इतर अटी पूर्वीच्या करारनाम्यानुसार राहतील.

३. सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपील शाखा( रिट सेल), मुंबई यांनी संदर्भ क्र. ८ येथील पत्रान्वये भाडेकराराची मुदत वाढविण्यास मंजूरी देण्याची विनंती केलेली आहे. त्यानुषंगाने दि. १.११.२०२२ पासून पुढील ५ वर्षाकरिता भाडेकराराचे नुतनीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा (रिट सेल), मुंबई या कार्यालयाकरिता भाडयाने घेण्यात आलेल्या एम.टी.एन.एल., कुपरेज टेलिफोन एक्सचेंज बिल्डिंग, मुंबई येथील ७ व्या मजल्यावरील ६३८५ चौरस फुट चटई क्षेत्रफळ जागेबाबतच्या भाडेकराराचे दि. १.११.२०२२ पासून पुढील ५ वर्षाकरिता नुतनीकरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच त्यानुषंगाने रु.३८७.८२/- प्रती चौ. फूट प्रति मास या दराने (सध्याचे व भविष्यातील कर, शुल्क व उपकर तथा पाणी पट्टी वगळून) येणा-या रु. २४,७६,२३१/- (अक्षरी रुपये चोवीस लक्ष शहात्तर हजार दोनशे एकतीस फक्त )इतक्या मासिक व रू.

२,९७,१४,७६८/- (अक्षरी रुपये दोन कोटी सत्त्यान्नव लक्ष चौदा हजार सातशे अडुसष्ट फक्त) इतक्या वार्षिक भाडे खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. महानगर टेलिफोन निगम लिमिटेड, मुंबई यांच्याशी पुढील ५ वर्षासाठी भाडे करारनामा करण्यासाठी सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, अपिल शाखा(रिट सेल), मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. याप्रित्यर्थ येणारा खर्च हा “मागणी क्र.जे-१, लेखाशिर्ष २०१४-न्यायदान, ११४ विधि सल्लागार व समुपदेशी (००) (०१), विधि सल्लागार व समुपदेशी (शहर अधिकारी), (दत्तमत) (अनिवार्य) १४-भाडेपट्टी व कर (संकेतांक क्रमांक २०१४ ०२९९)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो चालू सन २०२२-२०२३ च्या तसेच प्रतिवर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.२६१/व्यय-५, दि.०२.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन, तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/विनियम, भाग २, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका -१९७८ भाग पहिला, उपविभाग-१ मधील अ.क्र.१०, मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील नियम क्र. ११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील नियम क्र.१४७ (क) खालील टीप -१ अन्वये प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा संकेतांक क्र. २०२३०३२३१३४२१९२८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJESH BAJIRAO GHADGE

Digitally signed by RAJESH BAJIRAO GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=cf72ed51d101be222757ea3b6d64ed5fc5de8f8529121e097e2203b90069afce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5D6F97DBFEFD0A526C757773EA06AC43B9D1DC7C582C6F4747CD504E990F85FF, cn=RAJESH BAJIRAO GHADGE
Date: 2023.03.23 13:50:30 +05'30'

**( रा. बा. घाडगे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय ,अपिल शाखा(रिट सेल), मुंबई.
५. आस्थापना अधिकारी, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय ,अपिल शाखा(रिट सेल), मुंबई.
६. उप महाप्रबंधक (परिसंपत्ती प्रबंधन) यांचे कार्यालय, महानगर टेलिफोन निगम लिमिटेड (MTNL) (भारत सरकारचा उपक्रम), १६ वा माळा, टेलिफोन हाऊस, प्रभादेवी, दादर (पश्चिम), मुंबई-२८.
७. डेप्युटी जनरल मॅनेजर (ॲसेट मॅनेजमेंट), १६ वा माळा, टेलीफोन हाऊस, प्रभादेवी, दादर (पश्चिम), मुंबई-२८.
८. डेप्युटी मॅनेजर (स्पेस मॅनेजमेंट-III)एम.टी.एन.एल., टेलीफोन हाऊस, ३ रा माळा, व्ही.एस.मार्ग, दादर (पश्चिम), मुंबई-२८
९. महालेखापाल महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (कार्यासन-२३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती/कार्यासन ८.